GR- 200408131644 15001 - 1700

१ जानेवारी,१९९५ पर्यंत अस्तित्वात असलेल्या
झोपडपट्टीतील झोपडीधारकांना ओळखपत्र
(फोटोपास) देण्याबाबत शासनाचे सुधारित धोरण.

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण विभाग
शासन निर्णय क्रमांक : गवसु २००४/प्र.क्र.१५/झोपसु-१-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३ फेब्रुवारी, २००४.

वाचा : १) शासन निर्णय, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग
क्र.गवग १२१०/प्र.क्र.११५/झोपसु-१, दि.९ मार्च,२०००
२) शासन निर्णय, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग
क्र.गवसु १२२०/प्र.क्र.२०४/झोपसु-१, दि.१७ नोव्हेंबर,२०००
३) शासन पत्र क्रमांक गवसु १२२०/प्र.क्र.२०४/झोपसु-१,
दि.२८.११.२०००
४) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग
क्र.गवसु-१२२०/प्र.क्र.२०४(१)/झोपसु-१, दि.११ जुले,२००१

**प्रस्तावना :**

संदर्भाधिन शासन निर्णयानुसार झोपडपट्टीवासियांचे सर्वेक्षण करुन पात्र झोपडपट्टीवासियांना ओळखपत्र देण्याबाबतचा शासन निर्णय यापूर्वीच निर्गमित करण्यात आलेला असून पात्र झोपडीधारकांना ओळखपत्र वितरणाचे काम आता अंतिम टप्प्यात आलेले आहे. मात्र याबाबत क्षेत्रीय अधिका-यांच्या कामाचा आढावा घेतला असता सदर शासन निर्णयाच्या परिच्छेद ९ मध्ये वसूल करावयाच्या हस्तांतरण शुल्काबाबत क्षेत्रीय अधिका-यांनी काही मुद्दे उपस्थित केले होते. त्याअनुषंगाने हस्तांतरण शुल्काबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

हस्तांतरण शुल्क :

बृहन्मुंबईतील शासकीय जमिनीवरील दि.१.१.१९९५ पूर्वी पात्र झोपडीचे हस्तांतरण झालेले असल्यास झालेल्या हस्तांतरणास जिल्हाधिकारी, मुंबई शहर/जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा यांनी मान्यता देऊन झोपडपट्टीवासियांकडून हस्तांतरण शुल्काची वसूली

त्यानी करावी. बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या व म्हाडाच्या जमिनीवरील झोपडपट्टी-वासियांकडून हस्तांतरण शुल्क अनुक्रमे महानगरपालिका व म्हाडाच्या जमिनीवरील झोपडपट्टीवासियांकडून हस्तांतरण शुल्क अनुक्रमे महानगरपालिका व म्हाडामार्फत वसूल करण्यात येईल व हस्तांतरण शुल्काची रक्कम ते स्वत:कडे ठेवतील. बृहन्मुंबई व्यतिरिक्त अन्य ६० शहरात हस्तांतरणाची मान्यता जमिनीची मालकी असलेल्या संस्थानी द्यावी व हस्तांतरण शुल्काची वसूली त्यांनीच करावी.

सदर पात्र झोपडीचे दि.१ जानेवारी, १९९५ पूर्वी कितीही वेळा हस्तांतरण झाले असेल तरी असे हस्तांतर एकदाच झाल्याचे समजून एकवेळच्याच हस्तांतरणाचे हस्तांतरण शुल्क वसूल करण्यात यावे.

हस्तांतरण शुल्क खालीलप्रमाणे वसूल करण्यात यावे.

| वापराचा प्रकार | क्षेत्र | हस्तांतरण शुल्क | शेरा |
|---|---|---|---|
| निवासी | २२५ चौ.फू.पर्यंत | रुपये ५०००/- | अतिरिक्त क्षेत्रासाठी रुपये ४०/- प्रति चौ.फू. |
| वाणिज्यिक, औद्योगिक संयुक्त | २२५ चौ.फू.पर्यंत | रुपये १०,००० | अतिरिक्त क्षेत्रासाठी रुपये ८०/- प्रति चौ.फू. |
| संयुक्त | २२५ चौ.फू.पर्यंत | रुपये ७,५००/- | अतिरिक्त क्षेत्रासाठी रुपये ६०/- प्रति चौ.फू. |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

(डॉ.सुरेश जोशी)
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव